दि.२५.७.२००१ रोजी झालेल्या राज्य शासकीय/निमशासकीय कर्मचाऱ्यांच्या लाक्षणिक संपाचा कालावधी नियमित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक, क्रमांक : एसटीके-२००४/प्र.क्र.४०/०४/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ नोव्हेंबर,२००४.

पहा :- शासन परिपत्रक क्र.: एसटीके-१००१/प्र.क्र.१०३/२००१/१६-अ,दि.२९ नोव्हेंबर, २००१.

**शासन परिपत्रक :-**

दि.२५.७.२००१ रोजी झालेल्या राज्य शासकीय / निमशासकीय कर्मचाऱ्यांच्या लाक्षणिक संपाचा कालावधी असाधारण रजा (विना वेतन, विना भत्ते) देऊन नियमित करावा व वित्त विभाग, शासन निर्णय दि.१५.१.२००१ अन्वये निवृत्ती वेतनासाठी अर्हताकारी सेवा म्हणून हिशोबात धरण्यात येऊ नये असे या विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये आदेश देण्यात आले होते. हे आदेश आता रद्द करण्यात येत आहेत.

२. या संबंधात शासन आता असे आदेश देत आहे की, शासकीय कर्मचाऱ्यांच्या दि.२५.७.२००१ रोजी झालेल्या संपामध्ये सहभागी झालेल्या कर्मचाऱ्यांची अनुपस्थिती असाधारण रजा (विना वेतन, विना भत्ते) म्हणून नियमित करुन असाधारण रजेचा कालावधी एक विशेष बाब म्हणून वित्त विभागाच्या दि.१५.१.२००१ च्या शासन निर्णयास अपवाद करुन सेवेतील खंड न समजता निवृत्ती वेतनासाठी अर्हताकारी सेवा म्हणून ग्राह्य धरण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३३३/०४/सेवा-८,दि.२८.८.०४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

द.दा.देशपांडे
(द.दा.देशपांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*७) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*८) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
*९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
*१०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
*११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
*१३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई,
१५) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर,
१६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
१७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
१८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई/ अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
१९) सर्व विभागीय आयुक्त
२०) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२१) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई / सर्व कोषागार अधिकारी,
२२) सर्व मंत्रालयीन विभाग,
२३) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
२४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२५) वित्त विभाग / सेवा-४,
२६) निवड नस्ती.

* (पत्राने)

रोटा/एच-734(4000-11-04).
ddd